ई साहित्य प्रकाशन

नेटाक्षरी

०९-०३-२००९
अंक : १६

# जागतिक महिला दिन विशेषांक



**संपादक -**
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

**अतिथी संपादक -**
प्रा.निशा पाटील ( नाशिक )
इरावती सामंत पाटकर ( ऑस्ट्रेलिया )

**सहसंपादक -**
सोनाली घाटपांडे ( पुणे )
रेणुका रेपाळ ( अमेरिका )
सुरुचि नाईक ( नागपूर )
आनंद माने ( सोलापूर )
सचिन काकडे ( मुंबई )
अहं ब्रम्हास्मि ( पुणे )
नाम गुम जायेगा ( ठाणे )

*ह्या अंकात वाचा..*



हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..

**netaksharee@gmail.com**

# स्त्री हृदयाची स्पंदनं

..मी फक्त स्त्री आहे..

कोण मी भांडणारी आहे?
कोण मी तंटणारी आहे?
मी तर अस्फुट कळी
स्वतःतच मिटणारी आहे

वीज मी दाहणारी आहे?
ज्वाळा मी पोळणारी आहे?
मी तर स्वतःतच कोसळून
भस्मात उरणारी आहे

काय मी उर्जा आहे?
नदी मी प्रवाही आहे?
तेज वाटत,प्यास बुझवत
सागरात संपणारी आहे

मानव जन्मून पक्षिणी आहे
आभाळात विहरुन तृणवत आहे
अंश एका ज्योतीचा असूनही
दिवली घेऊन शोधणारी आहे

वादळवाऱ्यात पदराखाली
तेज सांभाळत फिरणारी आहे
वाळवंटातली प्याऊ बनूनही
तहानलेली,तरसणारी आहे

कधी असामान्यतेचा बाज सांभाळत
दैनंदिन झिजणारी आहे
मी एक स्त्री आहे
मी एक स्त्रीच तर आहे

..प्रभा प्रभुदेसाई,चेन्नई..

..अहं..

माझ्या विचारांच्या चक्रीवादळात,हे कागद वाहून जातात
वाटा विरघळू लागतात,माझ्या उष्ण पावलांच्या दाहाने
आकाश फाटायला लागलं,कारण मी त्यात मावत नाही
देवही चिंतेत पडतो,जेव्हा मी कल्पना करु लागते
मी अशक्य,मी अतर्क्य,मी आदि,मीच अंतिम..

स्वतःच्या गरजांसाठी,भितींसाठी मला लाज वाटत नाही
ना वाटते भिती मला,अंधाऱ्या एकट्या रस्त्यांवरुन जाण्याची
मी गडद,काळी,गुळगुळीत,डोहातल्या कातळासारखी गार पण
माहितीच्या जंजाळात सराईतपणे पोहलांना,मला ओढ शून्याची
मी अशक्य,मी अतर्क्य,मी आदि,मीच अंतिम..

मीच असते सुंदर,मूर्ख,एक शोभिवंत बाहुली,भिरवणारी
कधी हजार गणिते करून,मी शक्यतांना प्रचंड छळणारी
मीच असते काम,क्रोध,मत्सर,वासनांमध्ये गुरफटणारी
कधी हातात आलेलं सर्व सोडून मी विरक्त,दूर पळणारी
मी अशक्य,मी अतर्क्य,मी आदि,मीच अंतिम..

माझं माणसांवर प्रेम आहेही पण खरं तर आहे फक्त स्वतःवर
काळाच्या चौथ्या भितीत गुदमरते आणि निर्वातात करते वावर
कधी चिंता करते विश्वाची तेव्हा मीच असते व्यापून ब्रम्हांड
जणू फक्त मला निर्मिलंय ब्रम्हाने,का मीच दिलाय त्याला जन्म
मी अशक्य,मी अतर्क्य,मी आदि,मीच अंतिम..

मी स्त्री आहे,जन्मदात्री आणि जाणवत असण्यातलं सामर्थ्यही
पण मीच उसळले आवेशात आव्हानांनी वाजवायला पुरुषार्थही
मीच गोड गुलाबी असते नाजूकही ठिसूळ अर्धी अपूर्णही
पण असते पूर्णही,अतुल्य,अविक्य,कठोर आणि एकटी
मी अशक्य,मी अतर्क्य,मी आदि,मीच अंतिम..

आता होऊ नये एकाग्र चित्त मी,सगळेच भस्मसात होईल
विखुरले आदि जर,त्या महास्फोटातून नवे विश्व जन्म घेईल
मी उर्जा,बिजांतून निद्रिस्त,अणू रेणूत ध्यानस्थ,सूक्ष्म अन अनंत
पण जागा होतो अहं,'मी'जेव्हा,होते मूर्त,उरते 'अनुश्री' फक्त
मी अशक्य,मी अतर्क्य,मी आदि,मीच अंतिम..

..अनुश्री वर्तक,मुंबई..



..मनस्वी..

फाडून टाक ती
तुझ्या स्वप्नांची तूच बांधलेली कबर
बघ स्वप्न कशी तरारुन उठतील
गुणगुणू लागतील,डोलू लागतील
का बांधलीस ही चौकट ? तत्वांची
तोडून टाक
बघ जरा बाहेर पडून
घे एक मोकळा श्वास
कसं हलकं वाटेल तुला
तरी आहेतच का
या भक्कम भिंती
लादलेल्या निर्णयांच्या
फोडून टाक
आणि ते कुंपण
बुरसटलेल्या रितीभातींचं
तेही उखडून टाक
आता लख्ख दिसू लागेल तुला
एक नवं क्षितीज
बघ
तुझ्या डोळ्यात आलेली चमक
मनात जागलेली स्वप्नं
स्वप्नात झालेली पहाट
आता प्रत्येक क्षण,प्रत्येक दिवस तुझा
आहे
फक्त तुझा
आणि ते क्षितीजही
जा जग बिनधास्त
एकदम बिनधास्त
एक मनस्वी आयुष्य

..ऋचा घाणेकर,पुणे..

..अग्निदिव्य..

चौदा वर्षांच्या या वनवासात
किती वनवास भोगावे लागले
दंडकारण्यात सुसह्य असा
तर सुवर्णलंकेतील असह्य असा
कृष्ण मायावी मोहजालातही
चारित्र्यावर शिंतोडे नाही उडाले
पण सत्याच्या लख्ख प्रकाशासही
लोकनिंदेचे भय झाकोळून गेले
राज्ञ कर्तव्याचे कठोर पालन
पतिधर्माचेच का मग विस्मरण?
पण हे तर केवळ क्षणिक आंदोलन
पत्नीधर्माचेच मग त्वरित आचरण
अग्निदिव्याचे बदलते संदर्भ
नित्य नवे घटनांचे अर्थ
सीतेची कुचंबणा आजही उपेक्षित
अग्निदिव्य मात्र तिच्याकडून अपेक्षित

..मेधा सकपाळ,लंडन..



## ..शक्तीदुर्गा..

एकटी मी,ना कुणाच्या सोबतीने रांगायचे
धाकटी जरी,वीज मी,संकटांना ना भ्यायचे

बाप बंधू पुत्र नवरा आजवर आधार गं
नीच मी,अबला,अशी आजवर समजूत गं
मनगटातील स्फुल्लिंग माझ्या मी अता चेतायचे
धाकटी जरी,वीज मी..

मी लता नाही कुणाचा आधारखड शोधायला
विद्युलता मी झळकते,विश्व सारे उजळायला
आज अडविल जर कुणी तर आडवे घालायचे
धाकटी जरी,वीज मी..

कोवळी असले तरी ना मुळी अलवार मी
कमनीय बांध्याची अशी दोधारीची तलवार मी
घाव जर पडला कुणावर चिंधड्या ते व्हायचे
धाकटी जरी,वीज मी..

आजवर जे सोसले आता नसे मंजूर ते
भय कशाचे एकवटूनी शक्ती सारी झुंजते
बुरशी चढलेल्या विचारांची भूते गाडायचे
धाकटी जरी,वीज मी..

..खरांगी देव,इंदूर..

## ..अग्नीदिव्य..

ढाळलेली आसवं कधी जात नाहीत वाया
नव्यानव्याने पालवते झिजलेली काया
कातळात फुटतात कसे लवलवणारे कोंब
पुनःपुन्हा खिरखिते रे घशामधली झोंब

पाठोपाठ चालत आले सहचारिणी होऊन
सर्व माझे पणाला लावले काळीजमाया देऊन
कुठे जाणे गती किती सवाल विचारले नाही
पायात कळा मेंदूत शीळा तरी कण्हणे कुथणे नाही

प्राजक्ताच्या फुलांप्रमाणे आपले अंकुर जपले
कोवळ्या मनात नीरत्व कसे घट्टपणे रोवले
शिणून थकून चालणार नव्हती तल्लख त्यांची मने
खत होऊन भक्कम केले त्यांचे पाठकणे

दूर दूर गाव दिवे मंद मंद झाले
जुन्या आठवणींचे ओंडके सगळे कधीच वाहून गेले
वर्तमानाचा पहाड किती भरभर कोरून काढला
भविष्यात आयुष्याचा पोकळ खुळखुळा तेवढा उरला

आयुष्यात अनेक आल्या तडजोडीच्या वेळा
नाळ तोडून सोसल्या साऱ्या अपमानाच्या कळा
करणे होते केले नाही याहून काही भव्य
भूमीमाते उदरी घेई,ठरले व्यर्थची अग्नीदिव्य

..सई लेले,ठाणे..

## ..हे सारं असंच बयो..

हे सारं असंच बयो
माहितेय मला
भांडं घासता घासता
हात थबकतो तुझा
पुन्हा पुन्हा
भांड्यावर घातलेल्या नावापाशी

ज्याच्या नावे कुंकू कोरतेस
नित्यनेमानं कपाळावर
त्याच्या शर्टाचं बटण शिवता शिवता
पुढचा टाकाचं घालावा वाटत नाही तुला

पण तुझं मन मोठं
तोच टाका दुप्पट शक्तीने घालतेस
जणू तो सातजन्मी
उसवूच नाही

इडापिडा टळो म्हणत
देवापाशी दिवा लावतेस
पावलांचा वेध घेत राहतेस
सुफळ संपूर्ण कहाणीचा

खरा शोध तुला तरी लागलाय बयो ?
आणि मला तर आजही स्मरतंय
पोत्यात पाय घालून पळायच्या
आपल्या दोघींच्या शर्यतीत

तूच नेहमी जिंकायचीस बयो !

..सोनाली घाटपांडे,पुणे..

## ..तेव्हा मी..

जेव्हा मी मारोनी मारली हाक
म्हणाले जग,अशी मारु नको हाक

जेव्हा मी मनातले बोलले सहज
म्हणाले जग,बाजूला घे तुझे जहाज

जेव्हा मी गेले विसरायला सगळे
म्हणाले जग,वागली अशी यात काय वेगळे
?

जेव्हा मी दिला सप्तरंगी इंद्रधनु
म्हणाले जग,वेडे काळंबेरं जणू

तेव्हा मी मनाशी बांधली गाठ
मी सरळ दोरी माझ्या जगात आणीन
स्वतः पहाट

..भक्ती जामगावकर,अहमदनगर..

## ..पिंजरा..

कोंडमारा होतोय माझा
घर नावाच्या पिंजऱ्यात
मी कोण?
मी एक स्त्री,एक गृहिणी
एक आई,एक पत्नी
मान सन्मान,आदर
सगळं आहे
पण मला भूक लागलीये प्रेमाची
आपुलकीच्या दोन शब्दांची
नोकर चाकर,पैसा,दागिना
कशाचीच कमी नाही
कमी आहे ती जिव्हाळ्याची
आपलं म्हणणाऱ्या माणसांची
ह्या चार भिंतींना घर म्हणायचं?
जिथे संवाद नाहीत
जिथे नात्यांचं अस्तित्व नाही
जिथे वाणी आहे फक्त नाण्यांची
जिथे भाषा आहे फक्त पैशांची
अरे हे कसलं घर?
हा तर नाटकाचा रंगमंच
एक प्रयोग संपला की पडदा पडतो
आणि मग दूसरा तिसरा
बाहेर पडायचंय मला
ह्या सोन्याच्या पिंजऱ्यातून
कारण सोन्याचा असला तरी
शेवटी पिंजरा तो पिंजराच

..मंजिरी मराठे,पुणे..

## ..आरस झुंबर..

खळ्ळकन
लक्ष दिव्यांचं झुंबर निखळलं
आणि लक्ष लक्ष काचा विखरल्या
प्रत्येक तुकडा चमकत होता
प्रत्येक तुकड्यात चमकत होते अस्तित्व
कोणाचे ? सहज डोकावून पाहिले
धक्काच बसला
परत परत विस्फारून पाहिले
प्रत्येक तुकड्यात वेगळाच चेहरा
दुर्गा
काली
सीता
अहिल्या
तारा
मंदोदरी
द्रौपदी
माधवि
राधा
मीरा
रुक्मिणी
सत्यभामा
मनकर्णिका
जीजा
आणि
अनेक रुपांत,अनेक नात्यांना
पेलणारी,सांभाळणारी
एक सक्षम स्त्री

..मुक्ता पाठक शर्मा,सिंगापूर..

# इराची मुद्रा



कार्येषु मंत्री,करणेशु दासी
भोज्येषू माता,शयनेषु रंभा
धर्मानुकूला क्षमया धरित्री
भार्याच षाडगुण्यवतीह दुर्लभा

हा संस्कृत श्लोक आपल्याला किती सहजतेने स्त्रीच्या गुणांची जाणिव करुन देतो.आणि केवळ हाच कशाला ? असे अनेक श्लोक,ग्रंथ,कविता स्त्री ची थोरवी शतकानुशतके उगाळत आले आहेत.किमान त्यामुळेच आपल्या प्रत्येकाच्या मनाच्या आरशावर हे प्रतिबिंब अगदी ठासून उमटतच किंबहुना ह्यापेक्षा स्त्री काही वेगळी असूच शकत नाही हे आपल्या मनाने पक्के ठरवलेले असते.वैदिक काळातील स्त्रीच्या मर्यादा,तिच्याकडून असलेल्या समाजाच्या अपेक्षा बऱ्याच अंशी वेगळया होत्या हे आपल्याला थोर विदुषी गार्गी,मैत्रेयी,लिलावती इ.स्त्रियांची नावं घेता आपसूकच उमगतं.स्वतःच्या बुध्दीने आणि सामर्थ्याने अचंभित करणारी स्त्री हळूहळू बुरख्याआड गेली आणि स्वतःचं अस्तित्वच विसरुन गेली.कालांतराने तर पायातील वहाणेचा दर्जा मिळालेल्या काळात तर स्त्रीला स्वतः माणूस असल्याचंही भान राहिलं नाही.स्त्रीच्या बौध्दिक धारेची चुणूक कळलेल्या पुरुषप्रधान समाजाने स्त्री सुरक्षितता आणि घराची जबाबदारी ह्या बेड्या घालून स्त्रीला चार भिंतीत दडवले आणि फक्त सहनशीलतेची देवी एवढ्या तिचे अस्तित्व शिल्लक ठेवले.

परत एकदा काळाने कलाटणी घेतली आणि महर्षि कर्वे,आगरकर,महात्मा फुले,राजा राम मोहन रॉय ह्यांच्या रुपाने स्त्री शक्तीला जीवदान मिळाले.सतीपध्दती,जरठविवाह,केशवपन ह्या वाईट रुढींविरुध्द आरोळी उठली.स्त्री शिक्षणासाठी प्रयत्न सुरु झाले आणि सुटकेची,ज्ञानाची कवाडं स्त्रीसाठी पुन्हा एकवार मोकळी झाली.सावित्रीबाई फुले,डॉ,आनंदीबाई जोशी,बॅरिस्टर रानड्यांच्या पत्नी रमाबाई,लक्ष्मीबाई टिळक अशी अनेक उदाहरणं पाहता ह्या स्त्रिया आधी स्वतःच्या मनाशी आणि मग समाजाशी लढल्या आणि शिकल्या हे समजते. आज २१ व्या शतकात स्त्रीचे वेगळेच रुप इंदिरा गांधी,किरण बेदी,मीरा बोरवणकर,कल्पना चावला इ.स्त्रियांमधून दिसले.दहिहंडी पासून पेट्रोलपंप,इतकंच काय,चंद्रावरही स्त्रीने भरारी मारली.आणि कुठलंच क्षेत्र आज तिला अशक्य,अप्राप्य राहिलं नाहीये.स्त्री शिकली.परिस्थितीशी झगडली.बंडखोर ठरली पण ती यशस्वी खऱ्या अर्थाने झाली का ? आज इंडिपेंडंट ह्या शब्दाखाली स्त्री काय सिध्द करु पहातेय ? आज एक एनआरआय म्हणून पाश्चात्य जगात पाहता पाश्चात्य जगतातील स्त्रिया कायमच भारतीय स्त्रीच्या तुलनेत विचारानेच नव्हे तर वागणुकीनेही अत्याधुनिक होत्या.

त्यांची राहणी सिगरेट,दारु,स्वैराचार सामावलेली आहे पण अपवाद वगळाता भारतीय स्त्री ही कायम मर्यादशील,कुटूंबवत्सल ह्या रुपात पिढ्यानपिढ्या दिसते.आज पाश्चात्य स्त्रीच्या विचारधारा अशा काही गोष्टींना संमती देतांना दिसत आहेत म्हणूनच लिव्ह इन रिलेशनशिप इथे बऱ्याच प्रमाणात आढळते.

कुटूंबसंस्था म्हणजे जबाबदारी आली.म्हणजेच हा प्रकार जबाबदारीपासून पळणे असाच होतोय.अशा रिलेशनशिप मधून सिंगल मदर किंवा सिंगल पॅरेंट ही संकल्पना मूळ धरतेय.हे लोण भारतातही रुजू लागलंय.स्त्रीची संमती,तिची विचारधारा बदलतेय ह्याचे काय परिणाम पुढे होणार आहेत ह्याचा विचार समाजाचा अत्यावश्यक घटक म्हणून स्त्रीने केलाच पाहिजे.अशी वेळ आली आहे कारण पाश्चात्य संकल्पनांचे,विचारांचे आदानप्रदान तरुण पिढीत फार सहजपणे होते. आणि ह्या स्वतंत्र विचारसरणीमुळे कुटूंबसंस्था तुटतेय,ढासळतेय.घटस्फोटाचे वाढते प्रमाण दिसतेय.खरोखरच हा स्त्रीचा उत्कर्ष ठरु शकतो का ? असा सल उरतो.

भारतीय स्त्रीत अजूनही इतकं निराशाजनक चित्र नक्कीच नाही.आजची स्त्री शिकते,नोकरीतील आव्हाने यशस्वीपणे पेलते.उद्योगक्षेत्रातही ती आघाडीवर आहे.नुसतेच
चूल आणि मूल न करता तिला कुटूंबाचा,नवऱ्याचा भरभक्कम पाठिंबाही मिळू लागला आहे.असेही चित्र भारतात दिसते.स्पर्धेच्या जगात स्वतःचे पाय घट्ट रोवून स्वतःबरोबर मुलांचा व कुटूंबाचाही ती विचार करतेय कारण एक स्त्री शिकली तर कुटूंब उध्दरते.कारण ती उत्तम सपोर्टर असतेच.म्हणुनचा प्रत्येक यशस्वी घटनेमध्ये तसेच घटनेमागे स्त्री शक्ती असते हे सर्वमान्य आहे.

लिहायचं झालं तर हा विषय न संपणारा व चिंतनशील आहे.पूर्वीची फक्त चूल आणि मूल करणारी स्त्री ही पुरुषाचीच जबाबदारी होती.आणि आज सर्व समर्थपणे पेलणारी,शिकलेली स्त्री अधिकाधिक जबाबदाऱ्यात रुतत गेली. आणि हे तिला कळलचं नाही की पुरुषाने त्याच्या जबाबदाऱ्या वाढवल्या नाहीत.
पण,स्त्रीने मात्र स्वतःबरोबर पुरुषाच्याही जबाबदाऱ्या वाटून घेतल्या.मग ह्यात विजय कुणाचा हा प्रश्न उरतोच..

इरावती सामंत पाटकर
(अतिथी संपादक)

..मी प्रकाशाची दूत आहे..

अवती भवतीच्या निबीड मिट्ट काळोखात माझं अस्तित्व
हीच माझ्या विजयाची खुण आहे
मी प्रकाशाची दूत आहे

अशी शांत ज्योत परजून तेवतांना
अंधाराने केलेले घाव दाखवायला गेले,
तर अख्खं तिमिरायणच निर्माण होईल माझ्या शब्दातून

पण अंधाराची गोष्ट सांगण्यासाठी
माझा जन्म झालेला नाही
मी प्रकाशाची दूत आहे

..आसावरी गुपचूप,पुणे..

# अतिथी संपादकाची ओळख

**नाव :** इरावती सामंत पाटकर
**शिक्षण :** एम.ए (मराठी साहित्य),डिप्लोमा इन जर्नलिझम,साहित्य भूषण पदवी (कुसुमाग्रज प्रतिष्ठान),कथ्थक विशारद
**पुरस्कार :**
१.बेस्ट स्टुडंट ऑफ द इयर २०००-०१ (एनकेटीटी कॉलेज)
२.राज्य पातळीवरील कथाकथन स्पर्धा पुरस्कार विजेती (माजी मुख्यमंत्री माननीय मनोहर जोशींच्या हस्ते)
३.एकांकिका विभागात सर्वोत्कृष्ट अभिनेत्री पुरस्कार (मुंबई युनिव्हर्सिटी)

मी २००३ ते ०७ ह्या कालावधीत वृत्तनिवेदिका म्हणून ठाणे लोकल केबलवर कार्यरत होते.तसेच भारतात 'नृत्यकथी' ह्या नृत्य वर्गाची संस्थापक व नृत्यशिक्षिका होते.
लग्नानंतर आता ऑस्ट्रेलियात स्थायिक झाले आहे.सध्या ह्युमन रिसोर्स मॅनेजमेंट्चा अभ्यास करत असून सर्व्हिस कॅशिअर म्हणून काम करीत आहे.

# तेजोमय निशा



८ मार्च हा दिवस महिला दिन म्हणून संपूर्ण जगात साजरा केला जातो.ह्या दिनाचा विचार करतांना शहरी तशाच ग्रामीण महिला माझ्या नजरेसमोर येतात.एकीकडे अंतरिक्षात झेप घेणारी,क्रीडाक्षेत्रात प्राविण्य मिळवणारी,उच्च पोलिस अधिकारी असलेली महिला आहे,स्वतःच्या हक्कांची,स्वातंत्र्याची तिला जाणीव आहे तर दूसरीकडे दुर्गम भागात राहणारी,अजूनही पाणी व सरपण यासाठी मैलोनमैल वणवण करणारी ग्रामीण महिला आहे.एक दारुण सत्य हे आहे की ह्या दोघींचेही शोषण विविध स्तरांकडून आज होत आहे.याचे कारण पुरुषी संस्कृतीच्या दृष्टीने त्या अजूनही फक्त स्त्रिया आहेत.समाजाचा यांच्याकडे पहाण्याचा दृष्टिकोण बदलेल तो सुदिन ! तोच खऱ्या अर्थाने महिला दिन म्हणावा लागेल.

समाजात महिलांचा असा एक स्तर आहे की,ज्या अनाथ,निराधार असल्याने अनेक सामाजिक संस्थांतून वाढत आहेत.झोपडीसारखे का असेना त्यांना स्वतःचे घर नाही,एकही नाते नाही.अशांचे संगोपन,रक्षण,पुर्नवसन करणाऱ्या अनेक सेवाभावी सामाजिक संस्था महाराष्ट्रात आहेत.नाशिक मधील 'आधाराश्रम' ही अशीच एक सेवाभावी संस्था आहे.ह्या संस्थेची मानद सचिव म्हणून काम करतांना अनेक चांगले वाईट अनुभव मला आलेत.अनेकदा फोनवर किंवा प्रत्यक्ष भेटून विचारले जाते की,घरकामासाठी मुलगी देता का?तेव्हा अशा लोकांना आम्हाला सांगावे लागते की, 'आपल्या कुटूंबातील मुलींसारख्या या मुली इथे राहतात,फरक फक्त एवढाच आहे की,ह्या मुली एका 'मोठ्या'कुटूंबात वाढतात,आम्ही त्यांना घरकामासाठी पाठवत नाही' .त्यावर एका गृहस्थाने मला विचारले की, 'मग बाहेर 'दत्तक योजना'असे कशाला लिहले आहे?तेव्हा स्वतःचे मूल म्हणून legal adopation ह्याला 'दत्तक योजना'म्हणतात.दोन वेळचे जेवण देणे म्हणजे पालन पोषण नव्हे हे त्यांना कधी समजणार?

अनेक विवाहेच्छुक तरुण संस्थेत येतात.आजपर्यंत संस्थेतील ५४ कन्यांचे विवाह झाले आहेत.आणि आमच्या कन्या आपापल्या घरी सुखाने नांदत आहेत.आपल्या घरातील मुलींचे विवाह आपण ज्या पध्दतीने ठरवितो तसेच आश्रमकन्यांचे विवाह आम्ही करतो.मुलाची चौकशी,घरच्यांची चौकशी,त्यांचे विचार हे पटले की,मग आमच्या कन्यांना त्यांचे मत आम्ही विचारतो आणि मगच विवाहाची बोलणी करतो.पण अनेकदा निराळाच अनुभव येतो.काही महिला,त्यांच्याबरोबर एखादा पुरुष संस्थेत येतो आणि आल्याबरोबर मुली पहायला आलो आहोत.मुली दाखवा असे फर्मान सोडतात. एका रांगेत आम्ही मुलींना उभे करावे मग त्यातील एखाद्या मुलीला आपल्याला पसंत करता येईल अशी त्यांची समजूत असते.त्यावेळी त्यांना आम्ही आमची विवाह जुळविण्याची पध्दत कोणत्याही सामान्य कुटूंबातील पध्दतीसारखी कशी असते हे पटवण्याचा प्रयत्न करतो.आम्हाला स्थळ पटले तरच आम्ही पुढे पाऊल टाकतो.हे कळल्यावर त्यांच्या चेहऱ्यावरील भाव पाहण्यासारखे असतात.संस्थेत वाढत असल्या तरी या मुलींनाही काही भावना आहेत.स्वतःच्या भावी पतीबद्दलची त्यांची काही स्वप्ने आहेत.त्यांच्या काही अपेक्षा आहेत यांचा विचारही न करता एखाद्या दुकानात जाऊन चार साड्या दाखवा असे सांगावे तसे मुली दाखवा म्हणणाऱ्या समाजातील व्यक्तींची कीव करावीशी वाटते.

समाजाने व विशेषतः सुशिक्षितांनी अशा संस्थातून वाढणाऱ्या महिलांकडे अधिक सहानुभूतीने पाहिले पाहिजे.आमच्या संस्थेतील तरुणी आज आय.टी.आय,नर्सिंग,कॉम्प्युटर,डी.एड.,बी.ए.चे शिक्षण घेत आहेत.त्यांना आर्थिकदृष्टया स्वावलंबी करावे आणि मग त्यांचे पुर्नवसन करावे असे आमचे धोरण असते.तेव्हा कुटूंबात वाढणाऱ्या आपल्या मुलींप्रमाणेच त्यांना समाजानेही सन्मानाने वागवावे असे वाटते.महिला दिनाच्या निमित्ताने या उपेक्षित महिलांकडे पहाण्याचा समाजाचा दृष्टिकोण बदलला तरी तो सुदिन म्हणावा लागेल.

प्रा.निशा पाटील
(अतिथी संपादक)

# अतिथी संपादकाची ओळख

**नाव :** प्रा.निशा पाटील (एम.ए.,एम.फिल)
**नोकरी :** ३७ वर्षे (मराठी विभाग प्रमुख,के.टी.एच.एम. महाविद्यालय,नाशिक)
**पुरस्कार :**
१.नागरिक शिक्षक गौरव समिती व सार्वजनिक वाचनालय यांच्यातर्फे आदर्श प्राध्यापिका पुरस्कार
२.नाशिक जिल्हा मराठा विद्या प्रसारक समाजाचा आदर्श शिक्षिका पुरस्कार
३.महिला दिन सुरक्षा कक्ष प्रथम वर्धापनदिनी सामाजिक कार्याबद्दल गौरव(माननीय आर आर पाटील व आमदार छगनरावजी भुजबळ ह्यांच्या हस्ते
४.छात्रसेना विद्यार्थी संघटनेतर्फे निवृत्तीनंतर पुरस्कार

**शैक्षणिक समित्यांवर केलेले कार्य :**
१.शासन नियुक्त शिक्षणमंडळ सदस्य – नाशिक महानगरपालिका
२.महाराष्ट्र राज्य माध्यमिक,उच्च माध्यमिक मराठी अभ्यास मंडळावर नियुक्ती – ९ वी ते १२ वी च्या मराठीच्या पुस्तकांचे संपादन
३.पुणे विद्यापीठ मराठी अभ्यास मंडळ सदस्य
४.पुणे विद्यापीठ सिनेट सदस्य

**लेखन :**
१.यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापिठाच्या बी.ए.अभ्यासक्रमाच्या मराठीच्या २ पुस्तकांचे लेखन
२.पुणे विद्यापीठ प्रथम वर्ष वाणिज्य मराठी दूरशिक्षणाचे लेखन
३.'श्रध्देय' हे व्यक्तिचित्रांचे पुस्तक प्रसिध्द
४.स्थानिक वृत्तपत्रांमधून साहित्यिक,शैक्षणिक,सामाजिक व महिलांविषयक ३०० हून अधिक लेख प्रसिध्द
५.अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या कार्यवाह
६.अनेक स्मरणिकांचे संपादन



## ..तिला मात्र आपल्या समाजात मान नाही..

आई होण्यासारखा दुसरा मोठा सन्मान नाही
पण जिची कूस कधीच ओली झाली नाही
तिला मात्र आपल्या समाजात मान नाही
तीही एक स्त्रीच ना, तिलाही भावना आहेतच ना ?
हे कधीच कुणी समजून घेतले नाही
आणि तिला मात्र आपल्या समाजात मान नाही
ती तिच्या कर्तव्यात कधीच कमी पडली नाही
तिने तिच्या जबाबदाऱ्या कधीच नाकारल्या नाहीत
हे मात्र कुणीच पाहिलं नाही
आणि तिला मात्र आपल्या समाजात मान नाही
बीज अंकुरायला ओलेती जमीनच हवी
हा तर निसर्गाचाच नियम आहे
पण पडिक जमिनीची व्यथा कधी कुणी ऐकलीच नाही
आणि तिला मात्र आपल्या समाजात मान नाही
रोज रोज त्या कमतरतेची सल तिला बोचत असते
आयुष्याच्या रगाड्यात ते विसरायचा ती प्रयत्न करत असते
ही तिची धडपड कुणी बघितलीचा नाही
आणि तिला मात्र आपल्या समाजात मान नाही
स्त्री संपूर्ण होते मातृत्वाने हे सत्य मीही नाकारत नाही
पण आई होण्याआधी ती सुद्धा एक माणूसच आहे
हे मात्र कुणाला जाणवलंच नाही
आणि तिला मात्र आपल्या समाजात मान नाही
महाभारत लिहीणारे ऋषीमुनी व्यास सुद्धा आपल्याला हेचा शिकवतात
जन्म घेतला देवकीपोटी तरीही कान्हा यशोदेकडेच नांदतो
एवढ्या महान संदर्भाची कुणाला साधी आठवणही नाही
आणि तिला मात्र आपल्या समाजात मान नाही
मीही अशीच एकटीच विरून जाणार ?
माझ्यासारखं दुसरं कुणीच नसणार ?
माझ्यासारखे डोळे नाक केस कुणाचेच नसणार ?
माझ्या आवडी, माझ्या सवयी, माझे छंद ,
मी कोणामध्ये जोपासणार ?
तिची ही खंत कुणी ऐकलीचा नाही
आणि तिला मात्र आपल्या समाजात मान नाही
आभाळा एवढं मन हवं हे दुख़ पचवण्यासाठी
आणि एक मोकळं प्रेमळ मन हवं तिला समजून घेण्यासाठी
तिची ही वेडी आशा कुणापर्यंत पोचलीच नाही
आणि तिला मात्र आपल्या समाजात मान नाही
प्रेमाचं गर्भारपण हृदयात असेल
तर नऊ महिन्यांची सुद्धा गरज नाही
कुशीत घेता ते अजाण बाळ
त्या स्त्रीला समाजाचीही गरज नाही
मनाची कवाडं जरा खुली करा रे
जन्म मिळाला स्त्रीचा तेव्हाच ती संपूर्ण झाली रे
आई, बहिण, पत्नी, मुलगी ही सर्व मायेचीच रुपं रे
मी सुद्धा एक स्त्री आहे याचा आहे मला अभिमान रे
नाभितून जुळतो आई आणि बाळातला दुवा
एक स्त्रीच घडवू शकते विचारशील आणि संवेदनशील समाज नवा

..भारती सरमळकर,मुंबई..



## ..मी..

मीच होते येसुबाई,मीच होते ताराऊ
होते मीच आनंदीबाई
आणि मीच होते लक्ष्मीबाई

इतके सगळे करुनही
मी शेवटी अशीच राहिले

मीच उभारला राष्ट्र स्थापनेचा झेंडा
मलाच होती चीड
असत्याची,पराधीनतेची
हीच का ती मी ?

अजूनही मी अशीच आहे
स्त्री मुक्तिची आंदोलने करीत आहे
माझ्या मुक्तीसाठी
मीच अशी झटते आहे
गांजलेली,रंजलेली,मी

कुणास ठाऊक कशी
पण उभी आहे..

..शुभांगी सावंत,मुंबई..

## ..स्त्री शक्तिचा एक थेंब मी..

मी लेक,मायेत वाढून तेच बीज अंगिकारलेली
जन्माने सुख तर निरोपाने दुःख देणारी

एक बहीण नाजूक,रक्षणाचे कवच मागणारी
नि तुमच्या अश्रूंचे दान स्वतःसाठी मागणारी

मी अल्लड प्रेयसीही,निर्व्याज प्रेम करणारी
इंद्रधनुचे रंग आयुष्यात अलगद अचूक भरणारी

मी एक पत्नी,स्वयंपूर्ण तरी संसारासाठी वेचलेली
सुख दुःखाचे पारडे समर्थ,तोल सांभाळत पेलणारी

माता मी,कठोर तर कधी मातृत्वाने गाते अंगाई
वक्रदृष्टीस आडवा वार,वाघालाही पाणी पाजणारी

मी अबला,कधी सबला,हारते,हरुन जिंकावयासी
बुध्दी,रुप तर कधी तलवारीने रण गाजवणारी

मी शाप,बाजार मांडूनही स्व जातीला तारणारी
निर्लज्जपणे का असेना पण समाज सुधरवणारी

मी सकारात्मक कधी नकारात्मक भूमिकेतलीही
थांबा,इथे तुम्ही सर्वही आहातच की

मी बळीही,पण ठिणगीचा मी,जरी थंड असले तरी
धग मी अफाट,विध्वंस कणा कणात गोठवलेली

मी एक दिशा,आशा,उषा,निशा आणि नशाही
मी दृढ,गूढ,सूड मी मंथनातले अमृत नि विषही

मी कुरुप,सुरुप,स्वरुप आणि अरुपही कधी
मी सरस्वती,दुर्गा,रेणुका तर रणचंडिकाही कधी

या स्त्री शक्तिचा एक थेंब मी,माझ्यामुळे हा सागर
कशाला?हा स्त्री शक्तिचा थांग नसलेला सागरच मी

आता शिवालाही न पचणारे विष मी
जरी पार्वती,तरी आता फक्त नारी मी

पण खबरदार !लक्षात राहू द्या मंथनाचे
आणि हो,हे मंथनही मीच..विचारांचे

तरीही मी संस्कृती जाणणारी,जपणारी,रुजवणारी
थेंबातली ठिणगी पण चौकटिच्या आतच अजूनही मी

..रेणुका रेपाळ,अमेरिका..

## संपादकीय

मी एक स्त्री आहे.

जाचक रुढी,समाज नियम,बंधनं तोडून घडवलेला माझा इतिहास मला माहितीये.अपार कष्टांच्या जोडिला संयम,माझ्यावर झालेले वार परतवण्याची ताकद माझ्या अणुरेणूत सामावून मी आजही टिकून आहे.

नम्रतेने ईश्वरी शक्तीसमोर झुकून नवनिर्मितीचे वरदान खुबीने सांभाळत माझं जीवन मी सुंदर बनवतेय.भविष्यकाळाची इंद्रधनुषी स्वप्ने फक्त रंगवत न बसता हातात असलेला वर्तमान घडवता येईल हीच उमेद माझ्या नसनसांत वहातेय.

मला संकटांशी भिडायचंय,लढायचंय,हार मानायची नाही आणि हरले तरी जिद्दीने पुन्हा उभं राहायचंय,जिंकण्यासाठी..

कोण माझ्या विरुध्द आहे ? कोण माझ्या सोबत आहे ? ह्या गोष्टी माझ्यासाठी गौण.

महत्वाचं आहे,मला माझी असलेली साथ.माझा प्राणवायु असलेला माझा आत्मविश्वास.

पण,तप्त जमिनीची तृष्णा शमवणाऱ्या कृष्ण मेघमालांनाही तहान लागतेच ना ?

खरं तर ,मनुष्यजन्मच मुळातच खडतर आहे.त्यात फुलांच्या मार्गाची अपेक्षा करणारे रक्तबंबाळ होतात.तिथे स्त्री,पुरुष असा भेदभाव नसतो.ह्याची जाण असणारं माझं मन जिथं रंगीबेरंगी फुलांच्या सुगंधात न्हातं तिथंच अन्याया विरोधात ज्वालामुखीसारखं उसळूनही उठतं.

हरेक रंग,हरेक रुप माझं जगाला भुलवतं,लुभवतं.

पण म्हणून मला कुणी शोभिवंत बाहुली समजण्याची घोडचुक करु नये.भावभावनांनी हुंकारणारी एक व्यक्ती आहे मी.आणि मला फक्त एकटीलाच यशाच्या मार्गावर पुढे जायचं नाहीये तर माझ्याबरोबर संपूर्ण स्त्रीजातीला पुढे न्यायचंय.

अशा अनेक विचार प्रवाहांचा संगम असलेला हा नेटाक्षरीचा अंक.

हा अंक करतांना एक गोष्ट प्रकर्षाने जाणवली ती म्हणजे,आजच्या स्त्रीला झालेली ‘स्वत्वाची’ जाणीव.चूल आणि मूल ह्यांत गुरफटलेली स्त्री उंबरठ्याबाहेर पडली.शिकली,सवरली.तिच्याबरोबर घर दारही आत्मविश्वासाने उभं राहिलं.पुरुषांचं वर्चस्व असलेली नवनवीन क्षेत्रं तिनं काबीज केलीत.तुलनेने ग्रामीण स्त्रियांची तितकीशी परिस्थिती सुधारली नसली तरी आपल्या मुलीने शिकावं,शिक्षणासाठी शहरात राहावं,तिच्या आयुष्याला तिने आकार द्यावा ही बदलती मानसिकताही खुप मोलाची आहे.

शहरी भागातल्या स्त्रियांसाठी त्यामानाने हा लढा सोप्पा दिसत असला तरी कामकाजाच्या ठिकाणची आव्हानं, आधुनिक जीवनशैलीतून उद्‌भवलेल्या निरनिराळ्या समस्यांना तोंड देणेही तिला चुकत नाहीये.

थोडक्यात,मार्ग सोप्पा नाहीचा आहे.आणि तो तसा कधी नसेलही.कधी होईल ते सांगता येत नाही.उम्मीद पे दुनिया कायम है..लढाई जारी रहेगी..

स्वप्ना कोल्हे
(संपादक)

### ..खलाशी..

बाबा,
घर सोडत नाहीये मी
नव्या जगात पाऊल ठेवतेय
आजवर किनाऱ्यावरुनच पाहिलीत
घोंघावती वादळं
हेलकावती जहाजं
आणि तटस्थ दीपस्तंभ देखील
रेतीत घर रचले,शंख शिंपले वेचले
तळाशी धडधडती माशांची स्पंदनं ऐकली
पुरे झालं असं पुळचट जिणं
किनाऱ्यावर उभ्या,गंजल्या जहाजासारखं
समुद्राला आव्हान नाही दिलंय मी
पण,त्याला साद जरुर दिलीय
काल अवेळी आलेली भरती आठवते ?
मला प्रतिसाद दिलाय त्याने
आता मला निघायलाच हवं
जर तुमच्या डोळ्यांतल्या लाटांनी मला रोखलं
तर मी बुडेल
तुम्ही बांध घालायलाच हवा
तरच मी तरेल
नौकेत एकटी असेन मी
नौकेबाहेर असेल विशाल समुद्र
मला हरवू पहाणारा
बुडवू पहाणारा
पण,
त्याच्याच साथीने शोधेल
नवे किनारे,नवे निवारे
कदाचित,नवीन समुद्र देखील !!
अन परत निघेल नवीन जगाच्या शोधात..

..स्वप्ना कोल्हे,नाशिक..




हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..

**netaksharee@gmail.com**